**स्थानिक निधी लेखा आक्षेपांचा निपटारा करण्यासाठी सुधारीत जिल्हास्तरीय लेखा परीक्षा समिती गठीत करुन संचालक , स्थानिक निधी लेखा यांची मान्यता घेऊन परिच्छेद वगळण्याची कार्यवाही करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः स्थानिले-२०१५/प्र.क्र.३४/वित्त-७**

बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट ,
मंत्रालय, मुंबई ४००००१
तारीख: ०३ सप्टेंबर २०२०

**वाचा :-**

१) **शासन परिपत्रक क्रमांकः** एयुडी-२००७/प्र.क्र.२७४३/वित्त -८, दि ०६ जुलै २००७.
२) **शासन परिपत्रक क्रमांकः** एयुडी-२००७/प्र.क्र.२७४३/वित्त -८, दि ७ जून २००८.
३) **शासन परिपत्रक क्रमांकः** एयुडी २००५/प्र.क्र.२६१५/वित्त -८, दि २६ जून २००७.
४) **शासन परिपत्रक क्रमांकः** एयुडी-२००७/प्र.क्र.२७४३/वित्त -८, दि २० डिसेंबर २०१०.

**प्रस्तावना:-**

स्थानिक निधी लेखा विभागाने राज्यातील पंचायत राज संस्थावरील काढलेल्या आक्षेपांची संख्या मोठया प्रमाणात प्रलंबित असून याबाबत भारताचे नियंत्रक व महालेखापाल यांनी दि . ३१ मार्च २००७ चे अहवालात तीव्र नाराजी व्यक्त केली होती . यासाठी शासनाने स्थानिक निधी लेखा आक्षेपांचा जलद निपटारा व्हावा यास्तव विशेष मोहिम आखली होती . करिता जिल्हास्तरीय लेखा परीक्षा समितीच्या स्थापनेबाबतही सदर अहवालात मुद्दा उपस्थित केलेला होता. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्र. १ व २ अन्वये स्थानिक निधी लेखा आक्षेपांचा निपटारा जलद व्हावा यासाठी जिल्हा स्तरावर तसेच विभागीय स्तरावर समित्या गठन करण्यात आल्या होत्या. तथापि या समितीच्या बैठकीत लेखा आक्षेपांचे अनुपालन तपासून स्विकृती देणे हे काम समाधानकारक होत नाही असे आढळून आले . परिणामी स्थानिक निधी लेख्यांच्या आक्षेपांची संख्या खुपच वाढत होती.

**शासन परिपत्रक:-**

भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक हे सन २००५-०६ पासून स्थानिक स्वराज्य संस्थाचा अहवाल नियमित करीत आहेत. महालेखाकार मुंबई/ नागपूर यांचेकडील प्रलंबित आक्षेप वगळण्याकरिता शासनाने गठीत केलेल्या लेखा परीक्षा समितीच्या धर्तीवर स्थानिक निधी लेखा आक्षेपांच्या अनुपालनासाठी संदर्भ क्र. १ व २ च्या परिपत्रकातील समित्या रद्द करुन जिल्हा स्तरावर स्थानिक निधी लेखा आक्षेपांचे निराकरण करण्याकरिता जिल्हास्तरीय लेखा परिक्षा समिती संदर्भ क्र . ४ अन्वये गठीत करण्यात आली होती .

तथापि मुंबई स्थानिक निधी लेखा परीक्षा अधिनियम १९३० मधील कलम ११(४) , ग्राम विकास विभागाचे दि. २०.१२.२०१० रोजीचे शासन परिपत्रक व ग्राम विकास विभागाचे दि २९.०४.२०१७ रोजीचे पत्र या संदर्भाच्या अनुषंगाने समिती गठीत करुन विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करावी . तसेच पत्र क्र. स्था. १८ /ब /भार /अधिभार प्र.क. /माहिती / वलेप अहवाल /न.क्र.१९५ /अ /१७२५, दि. १८ सप्टेंबर २०१८ अन्वये मुंबई स्थानिक निधी लेखा परीक्षा अधिनियम १९३० मधील कलम ११(४) नुसार आयुक्तांना सदर कलमामध्ये नमूद केलेली पध्दत अवलंबून जे आक्षेप आयुक्तांनी सोडून देणेचा निर्णय घेतलेला असेल त्याची प्रत संचालकांना द्यावयाची आहे . सदर आक्षेपाची प्रत संचालकांना मिळाल्यानंतर कलम १०(२) नुसार सदर आक्षेप संचालक वगळतील. लेखा परीक्षण अहवाल निर्गमित करणे ही बाब संचालकांच्या अधिकार कक्षेत असल्याने त्यांची मान्यता घेऊन परिच्छेद निकाली काढण्याची कार्यवाही करण्यात यावी.

सदरचे परिपत्रक हे वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र . ७/१०/लोलेस, दि. ३०.१०.२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन व (अ.नौ.सं.क्र ४३/२०१७ / वित्त विभाग) पत्र क्र. स्था. १८/ब/भार/अधिभार प्र.क./माहिती/वलेप अहवाल/न.क्र.१९५/अ/१७२५, दि. १८ सप्टेंबर २०१८ अन्वये मुंबई स्थानिक निधी लेखा परीक्षा अधिनियम १९३० मधील कलम ११(४) च्या अनुषंगाने संचालक, स्थानिक लेखा निधी यांचे प्राप्त झालेल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०३१२१७२३८२२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e73505a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2020.09.03 16:09:33 +05'30'

**( प्रविण जैन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त
२. महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा)(लेखा व अनूज्ञेयता)
३. महालेखापाल महाराष्ट्र- २, नागपूर (लेखा परिक्षा)(लेखा व अनूज्ञेयता)
४. संचालक लेखा व कोषागारे, संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई.

५. संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक , महाराष्ट्र , नवी मुंबई.
६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी .
८. सर्व सह सचिव / उप सचिव ग्राम विकास विभाग़, मंत्रालय, मुंबई.
९. सहसंचालक स्थानिक निधी लेखा
१०.सह मुख्य लेखा परिक्षक, विभागीय कार्यालय (सर्व विभाग)
११.उप मुख्य लेखा परिक्षक (सर्व)
१२.उप महालेखापाल (लेखा परिक्षा स्थानिक निधी मुंबई/ नागपूर.
१३.उप सचिव , वित्त विभाग (लोक लेखा समिती) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
१४.निवड नस्ती वित्त-७.